**कै.उध्दवराव तुळशीराम जाधवर फाऊंडेशन, पुणे संचलित डॉ.सुधाकरराव जाधवर इंग्लिश स्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, धनकवडी, जि.पुणे या शाळा व कनिष्ठ महाविद्यालयाचे निनाईदेवी शिक्षण संस्था, धनकवडी, पुणे या संस्थेस हस्तांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशाह ३११९/प्र.क्र.३४७/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १३ नोव्हेंबर, २०१९

**वाचा :** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक माशाह २०११/ (२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२

**संदर्भ :** विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांचे जा.क्र.शिउसं/माध्य-३०२/पुवि/शाळा हस्तांतर सुनावणी/६०५१/२०१८, दिनांक २९ ऑगस्ट, २०१८ चे पत्र.

**प्रस्तावना :**

कै.उध्दवराव तुळशीराम जाधवर फाऊंडेशन, पुणे संचलित डॉ.सुधाकरराव जाधवर इंग्लिश स्कूल ॲण्ड ज्युनिअर कॉलेज, धनकवडी, जि.पुणे या स्वयंअर्थसहाय्यित शाळा व कनिष्ठ महाविद्यालयाचे, निनाईदेवी शिक्षण संस्था, धनकवडी, पुणे या संस्थेस हस्तांतर करण्याचा संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

सदर शाळेचे, निनाईदेवी शिक्षण संस्था, धनकवडी, पुणे या संस्थेकडे हस्तांतर करण्यास खाली नमूद अटी व शर्तीवर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेची कोणत्याही कारणास्तव किमान पटसंख्येची अट शिथिल केली जाणार नाही.

(२) सदर शाळेस ज्या तत्वावर परवानगी दिली आहे, त्याच तत्वावर हस्तांतरणानंतरही कार्यरत राहील.

(३) सदर शाळा व कनिष्ठ महाविद्यालय स्वयंअर्थसहाय्यित असल्याने शाळेत कार्यरत शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे संपूर्ण दायित्व संस्थेवर राहील.

(४) व्यवस्थापन बदल झालेल्या शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या/मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी.

(५) शासनाकडून शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/वेतनेत्तर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे नवीन संस्थेस बंधनकारक राहील.

(६) सदर व्यवस्थापन बदल, शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्रमांक: माशाह २०११/(२१०/११) माशि-३, दिनांक १७ फेब्रुवारी, २०१२ मध्ये विहित केलेल्या नियमानुसार व कार्यपद्धतीनुसार अंमलात येईल.

(७) सदर शाळा स्वयंअर्थसहाय्यित शाळा असल्याने महाराष्ट्र स्वयंअर्थसहाय्यित शाळा (स्थापना व विनियमन) अधिनियम, २०१२ मधील तरतूदीनुसार सदर शाळेसाठीची सध्याची जमीन, निनाईदेवी शिक्षण संस्था, धनकवडी, पुणे या संस्थेच्या नावे असणे किंवा या संस्थेने (३० वर्ष कालावधीतून आधीच्या संस्थेचा ३ वर्ष

कालावधी वगळता) किमान २७ वर्षासाठी नोंदणीकृत भाडेकराराने घेणे आवश्यक राहील. याबाबतची कागदपत्रे संस्थेने विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांना सादर करणे आवश्यक राहील.

(८) सदरहू व्यवस्थापन बदलासंदर्भात शासनाकडे अथवा शिक्षण विभागाच्या क्षेत्रिय अधिकाऱ्यांकडे नव्याने कोणत्याही प्रकारच्या तक्रारी प्राप्त झाल्यास किंवा व्यवस्थापन बदला संदर्भातील अटी व शर्तीचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास किंवा व्यवस्थापन बदलापूर्वीच्या संस्थेतील कार्यरत शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या सेवाशर्तीचा नवीन संस्थेद्वारा भंग झाल्यास, हस्तांतरण रद्द करण्याचे अधिकार शासनास राहतील.

२. विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे यांनी वरील अट क्रमांक (७) ची पूर्तता झाल्यावर सर्व बाबी तपासून व वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त आवश्यक अटींचा समावेश करून, शाळेचे व्यवस्थापन बदलाबाबत ४ आठवडयात पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास अवगत करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११३१६५३०५५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2019.11.13 16:55:38 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, पुणे विभाग, पुणे
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, पुणे
४) अध्यक्ष/ सचिव, कै.उध्दवराव तुळशीराम जाधवर फाऊंडेशन, पुणे
५) अध्यक्ष/ सचिव, निनाईदेवी शिक्षण संस्था, धनकवडी, पुणे
६) निवडनस्ती ( एसएम-१).